महाराष्ट्र राज्य महिला आयोगाच्या
लेख्यांचे लेखा परीक्षण करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## महिला व बाल विकास विभाग

## शासन निर्णय क्रमांक- रामआ-२०१९/प्र.क्र.७६/का-१०

नविन प्रशासन भवन, तिसरा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक- ०८ जुलै, २०२०.

वाचा :-

१) महाराष्ट्र राज्य महिला आयोग अधिनियम, १९९३.
२) वरिष्ठ लेखाधिकारी, SS-II (A), प्रधान महालेखाकार (लेखापरीक्षा)-I यांचे पत्र क्र. SS-II (A)/ Charge १/File No.३३, दि.२९.७.२०१९.
३) सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य महिला आयोग यांचे पत्र क्र.ममआ-२०१९/का.२/१५७२, दि.३०.७.२०१९.

प्रस्तावना -

महाराष्ट्र शासनाने राष्ट्रीय महिला आयोगाच्या धर्तीवर महाराष्ट्र राज्य महिला आयोगाची स्थापना दि.२५ जानेवारी, १९९३ रोजी केली आहे. महाराष्ट्र राज्य महिला आयोग अधियम, १९९३ च्या कलम १७ नुसार महाराष्ट्र राज्य महिला आयोगाच्या लेख्यांचे लेखा परीक्षण भारताचे नियंत्रक व महालेखापरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या कार्यालयाकडून दरवर्षी करण्यात येईल, अशी तरतूद आहे. महाराष्ट्र राज्य महिला आयोगाच्या लेख्यांचे दरवर्षी स्वतंत्र लेखापरीक्षण करण्यासंदर्भातील अटी व शर्तींबाबत भारताचे नियंत्रक व महालेखापरीक्षक (कर्तव्ये, अधिकार आणि अटी) अधिनियम, १९७१ अंतर्गत कलम १९ (३) मध्ये तरतूद आहे.

२. महाराष्ट्र राज्य महिला आयोगाने संदर्भाधीन क्र.३ येथील पत्रान्वये महालेखाकार यांच्या सहमतीने महाराष्ट्र राज्य महिला आयोगाचे लेखापरीक्षण भारताचे नियंत्रक व महालेखापरीक्षक यांच्यामार्फत करण्याबाबत व तसे आदेश निर्गमित करण्याबाबत विनंती केली आहे. महाराष्ट्र राज्य महिला आयोगाचे लेखापरीक्षण भारताचे नियंत्रक व महालेखापरीक्षक यांच्यामार्फत दरवर्षी करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय-

महाराष्ट्र राज्य महिला आयोगाच्या लेख्यांचे सन २०१८-१९ पासून यापुढे दरवर्षी लेखापरीक्षण महालेखाकार, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्यामार्फत करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. महाराष्ट्र राज्य महिला आयोगाने लेखापरीक्षणासाठी आवश्यक असलेले सर्व लेखा पुस्तके, रोख पुस्तके, वार्षिक लेखे/ ताळेबंद इ. अद्ययावत ठेवून ते उपलब्ध करुन देण्याबाबतची कार्यवाही करावी.

३. महाराष्ट्र राज्य महिला आयोगाचे लेखे तयार करण्यासाठी सनदी लेखापाल (Chartered Accountant) यांची नेमणूक करण्याची कार्यवाही महाराष्ट्र राज्य महिला आयोगाने करावी.

४. महाराष्ट्र राज्य महिला आयोगाचे लेखापरिक्षण भारताचे नियंत्रक व महालेखापरीक्षक यांचे कार्यालयामार्फत करण्याबाबत खालील अटी व शर्ती राहतील.

१) भारताचे नियंत्रक व महालेखापरीक्षक हे त्यांच्या वतीने आणि त्यांनी निदेशित केलेल्या मार्गदर्शक सूचनेनुसार लेखापरीक्षण करण्यासाठी प्राथमिक लेखापरीक्षक नियुक्त करु शकतात. जर अशा लेखापरीक्षकाची नियुक्ती करण्यात आली, तर त्याचे लेखापरीक्षणाचे शुल्क त्या संस्थेने अदा करावयाचे आहे. आणि जर लेखापरीक्षक नियुक्त केला नसेल, तर लेखापरीक्षण करण्यासाठी झालेल्या खर्चाची रक्कम संस्थेने भारताचे नियंत्रक व महालेखापरीक्षक यांना अदा करावयाची आहे.

२) ज्या प्रकरणी प्राथमिक लेखापरीक्षक नियुक्त केले आहेत, सदर प्रकरणी प्राथमिक लेखापरीक्षकाने केलेल्या लेखापरीक्षणावर भारताचे नियंत्रक व महालेखापरीक्षक यांना सदर लेख्यांबाबत तपासणी व टिप्पणी करण्याचे अधिकार राहतील.

३) भारताचे नियंत्रक व महालेखापरीक्षक किंवा त्यांनी नियुक्त केलेली कोणतीही व्यक्ती यांना शासकीय लेख्यांच्या लेखापरीक्षणा संदर्भात भारताचे नियंत्रक व महालेखापरीक्षक यांच्याइतकेच समान हक्क, विशेषाधिकार आणि अधिकारीता राहील.

४) सदर लेखापरीक्षणाचा अहवाल, भारताचे नियंत्रक व महालेखापरीक्षक किंवा त्यांनी नियुक्त केलेली कोणतीही व्यक्ती, सदर शासकीय संस्थेला कळवतील. त्यानंतर सदर संस्था त्या अहवालाची प्रत शासनास जमा करेल. भारताचे नियंत्रक व महालेखापरीक्षक देखील सदर लेखापरिक्षणाच्या अहवालाची प्रत शासनास अग्रेषित करतील.

५) लोकहितास्तव दरवर्षी महाराष्ट्र राज्य महिला आयोगाच्या लेख्यांचे लेखापरीक्षण भारताचे नियंत्रक व महालेखापरीक्षक यांच्या कार्यालयामार्फत करण्यात येईल.

६) लेखापरीक्षणाची कार्यपध्दती व व्याप्ती भारताचे नियंत्रक व महालेखापरीक्षक यांनी ठरविल्यानुसार असेल.

७) भारताचे नियंत्रक व महालेखापरीक्षक हे त्यांच्या स्वेच्छाधिकारांतर्गत राज्य विधीमंडळाला लेखापरीक्षणाचा अहवाल सादर करतील.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००७०८१५०४०२८२३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAVINDRA SITARAM JARANDE

Digitally signed by RAVINDRA SITARAM JARANDE
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=186d0f0fdd27c79b9b3f859a90ec537946c37d5876e64ce525
d082e58e494c85, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBA,
serialNumber=4d2dc3dbd5c0f35a66a84c93b4cead367c64cc2bc9d73
91e9a053988a2f81b64, ou=WOMEN AND CHILD DEVLOPMENT,
o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=RAVINDRA SITARAM
JARANDE
Date: 2020.07.08 15:12:54 +05'30'

**( र. सि. जरांडे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मंत्री / राज्यमंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव (व्यय) / (लेखा व कोषागारे), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे
१०. सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य महिला आयोग, बांद्रा, मुंबई.
११. महाप्रबंधक, उपलोकायुक्त व लोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई.
१२. सर्व निबंधक, मा.उच्च न्यायालय, खंडपीठ, नागपूर / औरंगाबाद.
१३. सर्व जिल्हा न्यायाधीश, जिल्हा न्यायालय.
१४. सर्व जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय
१५. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
१६. महालेखापाल, महाराष्ट्र १ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परिक्षा), मुंबई.
१७. महालेखापाल, महाराष्ट्र २ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परिक्षा), नागपूर.
१८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१९. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
२०. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२१. सर्व मंत्रालयीन विभाग.
२२. निवड नस्ती, का-१०.